**"२२ एप्रिल" जागतिक वसुंधरा दिन व "१ मे" महाराष्ट्र दिन यांचे निमित्त साधून "दिनांक २२ एप्रिल, २०२५ ते १ मे, २०२५" या कालावधीत वसुंधरा संवर्धनाचे कार्यक्रम आयोजित करून त्याची प्रभावी अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: अभियान २०२५/ प्र.क्र.६६/ तां.क.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
**दिनांक: १९ एप्रिल, २०२५**

**शासन परिपत्रक:**

पर्यावरणातील वातावरणीय बदलाचे महत्व लक्षात घेता, पर्यावरण विभागाचा **"पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग"** असा नामबदल करण्यात आला आहे. निसर्गाशी असलेली कटिबद्धता निश्चित करण्यासाठी पृथ्वी, वायू, जल, अग्नी, आणि आकाश या निसर्गाशी संबंधित पंचतत्त्वावर पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग कार्य करीत आहे.

२. वातावरणातील गंभीर बदल आपण सर्वजण मागील काही वर्षात अनुभवत आहोत. वैश्विक पातळीवर या बदलांना अटकाव करण्यासाठी आणि आपली पृथ्वी म्हणजे वसुंधरा वाचवण्यासाठी व्यक्तीगत व सामुहिकपणे पर्यावरण संवर्धानासाठी व रक्षणाकरीता आपण सर्वांनी मिळून संकल्प व प्रयत्न करण्याची नितांत गरज आहे.

३. **"जागतिक वसुंधरा दिन":**

वसुंधरा दिनाची संकल्पना अमेरिकेतील गेलार्ड नेल्सन यांनी मांडली. त्यांनी अमेरिकेतील २ कोटींपेक्षा जास्त लोकांमध्ये पर्यावरणाच्या समस्यांबाबत जागृती केली. प्रदूषण आणि वन्यजीवांचा ऱ्हास या मुद्यावर तेथील समाजाच्या सर्व थरांतील लोकांनी आवाज उठवला. वायू, जल, वने, वन्यजीव आणि निसर्ग यांच्या संरक्षणासाठी तेथे मोठा राजकीय दबाव निर्माण झाला. अशा प्रकारे १९७० सालापासून **"२२ एप्रिल"** हा दिवस **'अर्थ डे'** म्हणजेच **"वसुंधरा दिवस"** म्हणून जगभर साजरा केला जात आहे. **आपल्या एकुलत्या एका पृथ्वीचे संवर्धन व संरक्षण करण्याच्या प्रत्येकाच्या जबाबदारीचे स्मरण करून देणे हेच जागतिक वसुंधरा दिनाचे मुख्य उदिद्ष्ट आहे**.

जागतिक वसुंधरा दिनाची यावर्षीची (म्हणजे सन २०२५ ची) थीम "**आमची शक्ती, आमचा ग्रह**" **(Our Power, Our Planet)** ही आहे.

४.	**“महाराष्ट्र दिन”:**

महाराष्ट्र राज्याची स्थापना १ मे १९६० रोजी झाली, आणि तेव्हा पासून हा दिवस '**महाराष्ट्र दिन**' म्हणून साजरा केला जातो. महाराष्ट्र दिन केवळ राज्याच्या स्थापनेचा दिवस नाही, तर तो पर्यावरणाचे संरक्षण आणि संवर्धन करण्यासाठीही एक प्रेरणा आहे. महाराष्ट्र सरकारने पर्यावरण संरक्षणासाठी अनेक महत्त्वपूर्ण पाऊले आता पर्यंत उचलली आहेत, आणि या प्रयत्नांना पुढे चालवण्यासाठी महाराष्ट्र दिनी विशेष कार्यक्रम आयोजित केले जातात.

५.	उपरोक्त परिच्छेदात नमूद केलेल्या बाबी विचारात घेवून **“जागतिक वसुंधरा दिन म्हणजे दिनांक २२ एप्रिल, २०२५ ते महाराष्ट्र दिन म्हणजे १ मे, २०२५”** या कालावधीत राज्यामधील विभागीय, जिल्हा, तालुका, ग्रामपंचायत व नागरी स्थानिक संस्थां पातळीवर पर्यावरणाचे संवर्धन व संरक्षण करण्यासाठी विविध कार्यक्रम आयोजित करून त्याची प्रभावी अंमलबजावणी करण्यात यावी. यासंदर्भात खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१) **या कार्यक्रमाचे ब्रीद वाक्य “पर्यावरण बचाओ वसुंधरा सजाओ ” (“पर्यावरण वाचवा वसुंधरा सजवा ”) असे राहील.**

२) **दिनांक २२ एप्रिल, २०२५**: या दिवशी राज्यस्तरावर मा. मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल आणि पशुसंवर्धन महोदया या कार्यक्रमाचे उदघाटन पवई तलावाच्या स्वच्छते पासून करणार आहेत. त्याचप्रमाणे विभागीय, जिल्हा, तालुका, ग्रामीण व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या व इतर संस्था, कार्यालये इत्यादींच्या पातळीवर वसुंधरा संवर्धनासाठी कार्यक्रमांचे आयोजन करून सुरवात करण्यात यावी.

३) **दिनांक २२ एप्रिल ते ३० एप्रिल २०२५**: या कालावधीत निसर्गाच्या “पंचमहाभूतांच्या” भूमी (जमीन), जल (पाणी), वायू (हवा), अग्नी (ऊर्जा), आकाश (संवर्धन) या घटकांपैकी किमान एका घटकावर दररोज काम करण्यात यावे. यामध्ये प्रामुख्याने सध्या घडत असलेले वातावरणातील बदलांमागची कारणे नागरीकांना समजावून सांगून एक जागरूक नागरिक म्हणून त्यांनी वैयक्तीक रित्या अथवा सामुहिक रित्या पर्यावारणाचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी एक छोटेसे पाऊल उचलल्यास वातावरणातील हे बदल काही अंशी कमी होण्यास मदत होवू शकेल. तसेच, शाळा व कॉलेज यामध्ये विविध स्पर्धांचे आयोजन करण्यात यावे. सदर स्पर्धेचे उद्दिष्ट आपल्या वसुंधरेचे संरक्षण व संवर्धन हे असावे.

४) **दिनांक २२ एप्रिल, ते २४ एप्रिल, २०२५** : या तीन दिवशी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील नदी, ओढे, नाले, तलाव व समुद्रकिनारे यांची स्वच्छता करण्याचा कार्यक्रम आयोजित करून सदर कार्यक्रमात

स्थानिक लोकप्रतिनिधी, पदाधिकारी, अधिकारी आणि विविध सामाजिक संस्था यांचा सहभाग घेण्यात यावा.

५) **दिनांक २५ ते २७ एप्रिल, २०२५** : या तीन दिवशी Reduce-Reuse-Recycle यावर आधारित विविध प्रयोगांचे आयोजन शाळा, महाविद्यालये, विविध शैक्षणिक संस्थामध्ये व इतर ठिकाणी करण्यात यावे. या प्रयोगांमधून सर्वोत्तम तीन प्रयोगांची (उमेदवारांची) निवड करून त्यांचा संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावर प्रमाणपत्र देवून सन्मान करण्यात यावा.

६) **दिनांक २८ ते ३० एप्रिल, २०२५** : या कालावधीत "पर्यावरण बचाओ वसुंधरा सजाओ " या मा.मंत्री महोदया यांच्या ब्रीद वाक्यानुसार पर्यावरणाशी अनुषंगीक एक ब्रीद वाक्याबाबतचे अभियान / स्पर्धा आयोजित करण्यात यावी. प्राप्त होणाऱ्या ब्रीद वाक्यांमधून तीन उत्कृष्ट ब्रीदवाक्ये निवडण्यात यावीत. निवड केलेल्यांना प्रामणपत्र देवून सन्मानित करण्यात यावे. सदर ब्रीदवाक्य येत्या वर्षात पर्यावरणविषयक विविध कार्यक्रमांमध्ये वापरावे. प्रत्येक जिल्ह्यातून हि तीन ब्रीदवाक्ये राज्याच्या पर्यावरण दिनाच्या विविध जाहीरात फलकातून जिल्हयातील विविध ठिकाणी दर्शविण्यात यावीत.

७) उपरोक्त उप परिच्छेद (२) ते (६) मध्ये नमुद केल्याप्रमाणे दिनांक २२ ते ३० एप्रिल, २०२५ या कालावधीत विविध कार्यक्रमांचे व स्पर्धांचे आयोजन करुन निवड केलेल्यांचा सन्मान दिनांक १ मे, २०२५ च्या महाराष्ट्र दिनाच्या कार्यक्रमामध्ये संबंधित जिल्ह्यांचे मा. पालकमंत्री महोदयांचे हस्ते करण्यात यावा व दिनांक १ मे रोजी प्रदूषण मुक्त महाराष्ट्र दिन साजरा करण्यात यावा.

८) उपरोक्त कालावधीत केलेल्या कामास विविध पातळीवरील प्रसार माध्यमांमधून प्रसिध्दी देण्यात यावी. तसेच, फेसबुक, व्टिटर इत्यादी सामाजिक माध्यमांवर कार्यकामाचे शिर्षक व इतर बाबींसह पोस्ट करण्यात यावे. हे करताना #majhivasundhara करण्यात यावे.

६. पर्यावरणाचे संरक्षण व संवर्धनासाठीचे विविध कार्यक्रम / उपाय योजना दिनांक २२ एप्रिल, २०२५ ते दिनांक १ मे, २०२५ या कालावधी नंतरही माझी वसुंधरा अभियान व इतर माध्यमातून नियमितपणे सुरू ठेवण्यात यावी.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतंस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२५०४१९१६२२४४१९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे नावाने व आदेशानुसार,

MADANE VISHAL VISHWAS

Digitally signed by MADANE VISHAL VISHWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CB16DB1CC002E115B709A8CA348A6483883493AAF53B7BE25836CDA1B57FF2DC, cn=MADANE VISHAL VISHWAS
Date: 2025.04.19 17:50:43 +05'30'

**(विशाल मदने)**
**शा.श्रे. २ तथा अवर सचिव**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास व सार्वजनिक बांधकाम विभाग) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल आणि पुशसंवर्धन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, ३२
५) मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
६) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
८) विभागीय आयुक्त (सर्व)
९) आयुक्त, तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
१०) जिल्हाधिकारी (सर्व)
११) आयुक्त, सर्व महानगरपालिका
१२) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१४) सह आयुक्त / उप आयुक्त, नगरपालिका शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
१५) सह आयुक्त / उप आयुक्त, नगरपालिका शाखा, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
१६) प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ (सर्व)
१७) उप प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ (सर्व)
१८) गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
१९) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायती (सर्व)
२०) ग्रामसेवक, ग्रामपंचायत (सर्व)
२१) निवडनस्ती (तां.क.१)